**सुधारित प्रशासकीय मान्यता**
**उमरगा, जि. धाराशिव येथे नवीन न्यायालयीन इमारत (तळ + ३) बांधणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. सीसीबी ११२४/प्र.क्र.९५/का-१३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ मे, २०२५

पहा :-

१) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय, क्र. सीसीबी-१११५/प्र.क्र.२०८/का-१३, दिनांक १७ जानेवारी, २०१७.
२) मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), मा. उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र.बी(डब्ल्यू) ६०४२/ १९९२(४७)/२१२३/४६७६३, दिनांक ३ ऑक्टोबर, २०२३.

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये उमरगा, जि. धाराशिव येथे नवीन न्यायालयीन इमारत (तळ + ३) बांधण्याकरिता रु. १८,६६,५१,७२८/- इतक्या खर्चास मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती. तद्नंतर उपरोक्त संदर्भाधीन क्र.२ येथील मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्या पत्रान्वये उमरगा, जिल्हा धाराशिव येथे न्यायालयीन इमारतीच्या बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला आहे. सदरहू प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

**उमरगा, जि. धाराशिव येथे नवीन न्यायालयीन इमारत (तळ + ३) बांधण्याकरिता रू.२६,६८,९१,०००/- (रुपये सव्वीस कोटी अडूसष्ट लाख एक्याण्णव हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | तपशील | रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १. | मुळ काम (आकस्मिक खर्चासह) बांधकाम खर्च | १२,६२,८६,८६४/- |
| २. | भूविकास व बागबगिचा | १५,००,०००/- |
| ३. | फर्निचर | २,०२,७८,०२३/- |
| ४. | अतिरिक्त बाबी | ३,६०,४१,१७४/- |
| ५. | विद्यूतीकरण, अग्निशामन यंत्रणा, सोलार यंत्रणा,पथ दिवे, वातानूकुलित यंत्रणा, उद्वाहन. | ३,०१,७५,८१७/- |
| ६. | भाववाढ | १,५२,२०,७६०/- |
| ७. | वस्तू व सेवा कर | ३,७३,८८,८१५/- |
| | **एकूण** | **२६,६८,९१,४५३/-** |
| | **म्हणजेच एकूण** | **२६६८.९१ लक्ष** |

२. ही सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) बांधकाम सुरु करण्यापूर्वी नमूना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेवूनच सुरु करावे.

२) सदरचे अंदाजपत्रक हे नमूना अंदाजपत्रक असल्याने या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, धाराशिव च्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

३) नियोजित जागा उपभोक्त विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

४) सदर कामाची निविदा काढताना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

५) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

६) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

७) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र. बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

८) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण २०२३/प्र.क.२१०/ इमारती-३, दिनांक २ फेब्रुवारी, २०२४ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

९) सदर काम सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या किंमतीत पूर्ण करण्यात यावे.

१०) अंदाजपत्रकीय कामात बदल करु नये.

११) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंता यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नयेत.

१२) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

१३) योजनेची अंमलबजावणी करताना प्रचलित शासन निर्णय, नियम, सीव्हीसी तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती अनुसरण्यात यावी.

१४) आवश्यकतेनुसार राज्य तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पूर्तता करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.

१५) सदर सुधारीत प्रशासकीय मान्यतेतील तांत्रिक बाबी निविदा विषयक क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता यास मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणाची तपासणी

त्यावेळेच्या प्रचलित शासन निर्णयानुसार करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च उपरोक्त कामासाठी "मागणी क्र. एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१, बांधकाम-कार्यक्रमांतर्गत-(०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), (०३)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम),५३- मोठी बांधकामे (४०५९ ०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-केंद्र हिस्सा) (२१)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३- मोठी बांधकामे (४०५९ १२२२)" तसेच "(२९) (०१) विधि व न्याय विभागांतर्गत कार्यालयीन इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) ५३ मोठी बांधकाम (४०५९ ३२२३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१८६/२०२३/ इमा-२, दिनांक २९ जानेवारी, २०२३, आणि मा.उपमुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखालील व्यय अग्रक्रम समितीच्या दिनांक १८ फेब्रुवारी, २०२५ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार आणि वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०५१६१२२५४५७११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VILAS VASANT GAIKWAD

Digitally signed by VILAS VASANT GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=64f5ab9e019c90ad5db684984df113ed09062245cb9e042be5b12e5aa482fc17, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CD7BB8BAA2D72280DD453A12422482D4768A126C83ECB44E84A8186EED4352A0, cn=VILAS VASANT GAIKWAD
Date: 2025.05.16 12:29:22 +05'30'

**( विलास वसंत गायकवाड )**
**विधि सल्लागार -नि- सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा.महाप्रबंधक, मा. उच्च न्यायालय, मुंबई,
४. मा.प्रबंधक, निरिक्षणे-२, बी (डब्ल्यू) शाखा, मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
५. मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, धाराशिव
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, छत्रपती संभाजीनगर.
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धाराशिव
९. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, धाराशिव
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, धाराशिव,

११.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१२.वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३.नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४.कक्ष अधिकारी, का.११ व १२,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५.निवड नस्ती/संग्रहार्थ, का.१३